व शिवाय धनुष्यें, बाण व उत्कृष्ट तरवारीही अर्पण कराव्या. कर्णपर्व समाप्त झाल्यावरही असेंच स्वस्थ चित्तानें सर्व इष्ट वस्तूंनीं परिपूर्ण अशा उत्तम सोपस्कर अन्नानें ब्राह्मण-संतर्पण करावें. राजेंद्रा, शल्यपर्वांतीं मोदक, गूळभात, वडे, घारगे, अनरसे वगैरे मिष्टान्नें व इतर सर्व प्रकारचे भोज्य पदार्थ करावे. गदापर्वाचे सांगतेस मुगदळाचे लाडू अवश्य असावे. स्त्रीपर्वसमाप्तीस ब्राह्मणांस रत्नें देऊन संतुष्ट करावें आणि ऐषीकपर्वाचे शेवटीं पुनः तूपभाताचें भोजन घालावें व मग सर्व प्रकारचें रुचकर व सोपस्कर अन्न वाढावें. शांतिपर्वाचे समाप्तीस असेंच पण हविष्यान्नानें ब्राह्मणभोजन घालावें. आश्वमेधिकाचे शेवटीं जी समाराधना करावयाची तींत लोकांस आवडणारे सर्व प्रकारचे पदार्थ असावे. याचप्रमाणें आश्रमवासिक पर्वाचे अंतीं द्विजांस हविष्यान्नाचें भोजन घालावें. मौसलपर्वाचे समाप्तीस. अशीच समाराधना करावयाची, पण तींत सर्व प्रकारचीं षड्रस अन्नें व गंध, पुष्पें, उट्या वगैरेही असावें. महाप्रस्थानिकाचे शेवटीं भोजनाचा बेत असाच सर्व प्रकारें उत्कृष्ट ठेवावा. स्वर्गारोहणपर्वाचे समाप्तीसही ब्राह्मणांस हविष्यान्न वाढावें. हरिवंश संपल्याबर तर सहस्रभोजन घालावें आणि ब्राह्मणास एक सालंकार धेनु अर्पण करावी. पार्थिवा, श्रोता दरिद्री असला तरी त्यानें ह्याचे निम्म्यानें तरी दानधर्म केलाच पाहिजे. विचक्षण श्रोत्यानें प्रत्येक पर्वाचे समाप्तीस एक महाभारताचें पुस्तक सुवर्णदक्षिणेसह वाचकास अर्पण करावें. हे भरतर्षभा, हरिवंश संपल्यावर जें सहस्रभोजन घालावयाचें त्यास आणि प्रत्येक पर्वाचे शेवटीं करावयाचे ब्राह्मणभोजनास दुधाची खीर अवश्य करून आग्रहपूर्वक वाढावी. शास्त्रज्ञानें मनोनिग्रहपूर्वक सर्व पर्वांच्या संहिता संपविल्यावर त्या पोथ्या रेशमी वस्त्रांत बांधून कणा वगैरे घातलेल्या मंगलस्थानीं ठेवून स्वतः स्वच्छ वस्त्रें, पुष्पमाला, व उत्तम अलंकार धारण करून आणि शुचिर्भूत होऊन त्या संहिताग्रंथांचें गंधपुष्प, भक्ष्य, पेय व इतर नानाप्रकारचे इष्ट व शुभ पदार्थ ह्यांच्या योगानें पृथक् पृथक् यथान्याय पूजन करावें; आणि, राजा, नंतर तोळाभर सुवर्णदक्षिणाही समर्पण करावी. चित्त निगृहित करून प्रत्येकानें सर्व पर्वांचे संहितांस तीन तीन पलें (सोळा तोळे) सुवर्ण द्यावें. गरिबानें ह्याचे निम्मे किंवा चतुर्थांश द्यावें, पण सामर्थ्य असून कंजुषपणा मात्र करूं नये. जें जें आपणास प्रिय असेल तें तें ब्राह्मणांस अर्पण करावें; आणि वाचकास म्हणजे आपल्या गुरूस आपल्या भक्तीच्या योगानें सर्वथा संतुष्ट करावें. सर्व देवता आणि नरनारायण यांचें नामसंकीर्तन करावें; आणि नंतर गंधमाल्यादिकांनीं द्विजोत्तमांचें उत्तम पूजन करून विविध इच्छित गोष्टी व लहान मोठीं दानें देऊन त्यांस संतुष्ट करावें. याप्रमाणें केलें असतां मनुष्यास अतिरात्र यज्ञाचें फल मिळेल आणि प्रत्येक पर्वासही क्रतुफल प्राप्त होईल. हे भरतश्रेष्ठा, ज्याचा वर्ण व पदें यांचा उच्चार स्पष्ट होत असून स्वरही उत्तम आहे असा विद्वान् वाचक भारताबरोबरच भविष्यही (पुढील फलश्रुतिही) ऐकवील. राजा जनमेजया, ब्राह्मणांचें भोजन झाल्यानंतर त्यांस विपुल दक्षिणा वगैरे द्यावी, आणि याचप्रमाणें वाचकासही उत्तम वस्त्रालंकार अर्पून भोजन घालावें. राजा, वक्ता संतुष्ट झाला असतां श्रोत्यावर —जीपरतें उत्तम कांहींच नाहीं अशी— मंगलकारक प्रीति करतो; आणि ब्राह्मण संतोष पावले असतां सर्व देवता प्रसन्न होतात. हे

भरतर्षभा, यानंतर सर्व इष्ट वस्तु व नानाप्रकारचे शुभ पदार्थ यांच्या योगानें सर्व ब्राह्मणांचें यथान्याय पूजन करावें.

हे मनुजेंद्रा, तूं मला विचारल्याप्रमाणें हा भारतश्रवणाचा विधि मीं तुला कथन केला. यावर सर्वांनीं अंतःकरणांत श्रद्धा मात्र ठेवावी. नृपोत्तमा, भारताचें श्रवण करीत असतां आणि सांगता करीत असतां परम कल्याणाची इच्छा करणारानें सदोदीत यत्नशील ( दक्ष ) राहिलें पाहिजे. भारताचें नित्य श्रवण व कीर्तन करावें. **ज्याच्या घरीं भारत ग्रंथ असेल त्याला जय हा ठेवलेलाच.** भारत हें परम पुण्यकारक असून ह्यांत नानाप्रकारच्या कथा आहेत. देवही भारताचें सेवन करितात; कारण तें परमपद होय. हे भरतर्षभा, भारत हें सर्व शास्त्रांत श्रेष्ठ आहे. भारताच्या योगें मोक्ष प्राप्त होतो, हें सत्य तत्त्व मी तुला सांगतों. महाभारताख्यान, पृथ्वी, धेनु, सरस्वती, ब्राह्मण आणि श्रीकृष्ण यांचें गुणगायन करणारा कदापि नाश पावत नाहीं. हे भरतर्षभा, वेद, पवित्र रामायण व भारत यांचे आदौ, अंतीं व मध्यें—सर्वत्र **श्रीहरीचेंच** कीर्तन आहे. ज्यांत श्रीविष्णूच्या दिव्य कथा व सनातन वेद यांचा समावेश आहे असें हें महाभारत परमपदाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें अवश्यमेव श्रवण करावें. ज्याला ऐश्वर्याची इच्छा असेल त्यानें हें परमपवित्र, धर्माचें निदर्शक व सर्वगुणमंडित आख्यान अवश्य श्रवण करावें. ज्याप्रमाणें सूर्योदय होतांच अंधकाराचा नाश होतो, त्याचप्रमाणें भारतश्रवण होतांच जोडिलेलें कायिक, वाचिक व मानसिक सर्व पाप नष्ट होतें. अष्टादश पुराणांचे श्रवणापासून जें फल प्राप्त होतें, तेंच फल ह्या ग्रंथाच्या श्रवणानें वैष्णवास प्राप्त होतें, यांत संशय नाहीं. याच्या योगानें स्त्रिया व पुरुष या सर्वांस वैकुंठप्राप्ति होते. पुत्र व्हावा अशी इच्छा करणाऱ्या स्त्रियांनीं हें विष्णूचें यशोवर्णन श्रवण करावें; यथोक्त फल मिळावें अशी इच्छा करणारानें श्रवणानंतर वाचकांस सुवर्णाचे पांच निष्क किंवा स्वशक्तिप्रमाणें दक्षिणा द्यावी; आणि आपणांस श्रेय प्राप्त व्हावें, असें इच्छिणारानें एक सवत्स कपिला धेनु वस्त्रांनीं भूषवून व शिंगें सुवर्णानें सुशोभित करून अर्पण करावी; त्याच्या हातांत कडीं, अंगठ्या वगैरे अलंकार घालावे; कर्णांतील कुंडलादि अलंकार द्यावे; विशेषेंकरून विपुल धन अर्पण करावें; आणि, राजा, वाचकांस भूमिदानही करावें. कारण भूमिदानासारखें दुसरें दान झालें नाहीं व होणारही नाहीं. जो मनुष्य सतत हें श्रवण करितो किंवा दुसऱ्यांस ऐकवितो, तो सर्व पापांपासून पूर्णपणें मुक्त होऊन वैष्णवपदीं अधिरूढ होतो; आणि, राजा, तो एकादश पिढ्यांतील सर्व पितरांस, स्वतःस आपल्या संततीस आणि स्वभार्येसही उद्धरून नेतो. ह्याप्रमाणें, राजेंद्रा, सर्व श्रवण केल्यानंतर त्याच्या दशांश हवनही करावें. हे नरर्षभा, याप्रमाणें हें सर्व मीं तुला कथन केलें आहे.

